**केंद्र शासनाच्या योजने अंतर्गत राज्यात सार्वजनिक-खाजगी सहभाग (पीपीपी) तत्वावर इंडियन इंस्टिट्यूट ऑफ इंफॉरमेशन टेक्नोलॉजी (I.I.I.T.) स्थापन करण्यासाठी मौजा- वारंगा ता.नागपूर (ग्रा.) जि.नागपूर येथील ३९.९६ हेक्टर आर शासकीय जमीन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जमीन-२०१४/प्र.क्र.४५/ज-८**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
१ ला मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :२० जून, २०१५.

संदर्भ: विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.जशा/कार्या ९(४)/सिआर १/१४ दि.२१ जानेवारी,२०१४.

प्रस्तावनाः-

माहिती तंत्रज्ञान क्षेत्रातील वाढती आव्हाने विचारात घेता केंद्र शासनाच्या मानव संसाधन विकास मंत्रालयाने केंद्र शासन, राज्य शासन व खाजगी संस्था यांच्या सहभागाने सार्वजनिक-खाजगी सहभाग तत्वावर देशात २० नवीन इंडियन इंस्टिट्यूट ऑफ इंफॉरमेशन टेक्नोलॉजी (I.I.I.T.) स्थापना करण्याचा निर्णय घेतला आहे. सदर संस्था केंद्र शासन, राज्य शासन व औद्योगिक भागीदार यांच्या संयुक्त सहभागातून चालविण्यात येणार आहेत. सदर संस्था “ना नफा-ना तोटा” तत्वावर चालणाऱ्या, स्वायत्त, स्वयंपूर्ण तथा संशोधनावर आधारित अध्यापनात कार्यरत संस्था असतील.

उपरोक्त निर्णयाच्या अनुषंगाने केंद्र शासनाच्या सदर योजने अंतर्गत सार्वजनिक-खाजगी सहभाग (पीपीपी) तत्वावर राज्यात नवीन भारतीय माहिती व तंत्रज्ञान संस्था [ इंडियन इंस्टिट्यूट ऑफ इंफॉरमेशन टेक्नोलॉजी (I.I.I.T.)] या संस्थेची नागपूर येथे स्थापना करण्यासाठी मौजा-वारंगा ता.नागपूर(ग्रा.) जि.नागपूर येथील स.क्र.१४० आराजी ७६.२९ हे.आर. पैकी ३६.२९ हे.आर व स.क्र.१४१/१ आराजी ७.६७ हे.आर. पैकी ३.६७ हे.आर. अशी एकूण ३९.९६ हेक्टर आर शासकीय जमीन नाममात्र रूपये १/- दराने ३० वर्षाच्या भाडेपट्ट्याने नियमित अटी व शर्तीवर उच्च व तंत्र शिक्षण विभागास देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. ह्या संदर्भात दिनांक २० मे, २०१५ रोजी मंत्रिमंडळ बैठकीत विचार विनिमय होऊन झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**शासन निर्णय:-**

देशात सार्वजनिक-खाजगी सहभाग तत्वावर नवीन भारतीय माहिती व तंत्रज्ञान संस्था [ इंडियन इंस्टिट्यूट ऑफ इंफॉरमेशन टेक्नोलॉजी (I.I.I.T.)] स्थापन करण्यासाठी राज्य शासनाने विनामूल्य जमीन उपलब्ध करुन देण्यासंदर्भातील केंद्र शासनाच्या धोरणाचा विचार करता केंद्र शासन, राज्य शासन व औद्योगिक भागीदार यांच्या सहभागातून सार्वजनिक-खाजगी सहभाग तत्वावर नागपूर येथे भारतीय माहिती व तंत्रज्ञान संस्था (I.I.I.T.) या शैक्षणिक संस्थेची स्थापना

करण्यासाठी शासनाच्या उच्च व तंत्रशिक्षण विभागाने मागणी केल्यानुसार मौजा- वारंगा ता.नागपूर(ग्रा.) जि.नागपूर येथील स.क्र.१४० आराजी ७६.२९ हे.आर. पैकी ३६.२९ हे.आर व स.क्र.१४१/१ आराजी ७.६७ हे.आर. पैकी ३.६७ हे.आर. अशी एकूण ३९.९६ हेक्टर आर शासकीय जमीन महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ मधील कलम ३८ व कलम ४० अन्वये प्राप्त अधिकारांचा वापर करून नाममात्र रूपये १/- दराने ३० वर्षाच्या भाडेपट्ट्याने नियमित अटी व शर्तीवर तसेच खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून महाराष्ट्र शासनाच्या उच्च व तंत्र शिक्षण विभागासाठी मंजूर करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे:-

<u>अटी व शर्ती</u> :-

१) सदरची जमीन उच्च व तंत्रशिक्षण विभागास रू. १/- या नाममात्र भाड्यावर ३० वर्षासाठी भाडेपट्ट्याने देण्यास मान्यता देण्यात आली असून सदरची जमीन सार्वजनिक-खाजगी सहभाग तत्वावर भारतीय माहिती व तंत्रज्ञान संस्था (I.I.I.T.) यांचे संचलन व व्यवस्थापन करण्यासाठी केंद्र शासन, राज्य शासन व औद्योगिक भागीदार यांच्या सहभागाने स्थापन करण्यात येणाऱ्या संस्थेस पोटभाड्याने देण्याची मुभा असेल. या मंजूर प्रयोजनाव्यतिरिक्त अन्य कोणत्याही प्रयोजनासाठी शासनाच्या मंजूरीशिवाय सदर जमिनीचा वापर करता येणार नाही. तसेच या शासन निर्णयाव्दारे शासनाच्या मंजूरी दिलेल्या बाबीव्यतिरिक्त महसूल विभागाच्या पूर्वमान्यतेशिवाय ही जमीन अथवा त्याच्या कोणत्याही भागाची विक्री, बक्षीसपत्र, गहाण व अन्य कोणत्याही प्रकारे हस्तांतरण करता येणार नाही. तसेच शासनाच्या महसूल विभागाच्या पूर्वमान्यतेशिवाय सदर जमीनीचे पोट विभाजन करता येणार नाही.

२) सदर भाडेपट्टा ज्या अटी व शर्तीवर मंजूर करण्यात येईल, त्याच अटी व शर्तीवर वेळोवेळी उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या विनंतीवरून नुतणीकरणास पात्र असेल.

३) सदर जमिनीचा ताबा मिळाल्यापासून दोन वर्षाच्या आत बांधकामास सुरूवात करणे बंधनकारक राहील.

४) शासकीय जमीन मंजूरी संदर्भातील इतर नियमित अटी या ठिकाणी लागू राहतील.

५) विषयांकित जमिनीवर सक्षम प्राधिकरणाच्या परवानगीने व मंजूर विकास नियंत्रण व नियमावलीनुसार मंजूर प्रयोजनासाठी विकास करणे बंधनकारक राहील. तसेच या व्यतिरिक्त अन्य संबंधित विभाग / शासकीय यंत्रणा यांची मान्यता / पूर्वपरवानगी /नाहरकत आवश्यक तेथे घेणे बंधनकारक राहील.

६) सदर जमीन मंजूर करण्याबाबतच्या अटी व शर्तींचा भंग झाल्यास जमीन शासनास परत करण्यात येईल, अशी अट भाडेपट्टा करारनाम्यात नमूद करण्यात यावी.

७) जिल्हाधिकारी, नागपूर यांना योग्य वाटतील अशा अन्य अटी व शर्ती विहित करण्याची मुभा राहील.

सदर शासन निर्णय वित्त विभागाशी विचारविनिमय करून त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २०२/२०१५ दि. १२.०६.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in. या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०१५०६१७१५०६५६७३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Manik Abaji Gutte

Digitally signed by Manik Abaji Gutte
DN: CN = Manik Abaji Gutte, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.06.20 17:19:36 +05'30'

**( मा.आ. गुट्टे )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई -३२.
७. अप्पर मुख्य सचिव (वित्त विभाग) मंत्रालय, मुंबई -३२.
८. प्रधान सचिव, उच्च व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय,मुंबई -३२.
९. सचिव, (मदत व पुर्नवसन) महसूल व वन विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई -३२
१०. प्रधान सचिव (महसूल) यांचे विकाअ/स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई -३२.
११. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
१२. जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे .
१३. जिल्हाधिकारी, नागपूर.
१४. मा. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य,(१) मुंबई -३२.
१५. मा. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य,(२) नागपूर
१६. नगर विकास विभाग (नवि-९), मंत्रालय,मुंबई -४०० ०३२,
१७. वित्त विभाग (व्यय-९), मंत्रालय,मुंबई -४०० ०३२,
१८. सर्व सह सचिव/ उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई .
१९. निवडनस्ती, कार्यासन ज-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई -३२.